शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मान्यतेनुसार राज्यात अभियांत्रिकी / औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था / नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास / प्रवेश क्षमता वाढ / घट/ PIO व अभ्यासक्रम बंद करण्यास शासन मान्यता देण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांकः- मान्यता -२०१४ / प्र.क्र.५२ /तांशि-५**

मंत्रालय विस्तार भवन,मुंबई- ४०० ०३२.

दिनांक:- २३ जुलै, २०१४

संदर्भ:- **१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.१०/ एनजीपी /२०१४/४१८, दिनांक १२.०५.२०१४.**

**२) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.१० /पदविका/२०१४-१५/६२३, दिनांक ५.०७.२०१४.**

**प्रस्तावना :-**

शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मान्यतेनुसार राज्यात अभियांत्रिकी / औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था / नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास / प्रवेश क्षमता वाढ / घट / PIO व अभ्यासक्रम बंद करण्यास शासन मान्यता दिलेली आहे,त्यानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेकडून पदविका अभ्यासक्रमाच्या संस्थांना प्राप्त झालेल्या मान्यतेच्या अनुषंगाने बृहत आराखडयानुसार पात्र असलेल्या व संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयाने अनुकूल शिफारस केलेल्या अभियांत्रिकी / औषधनिर्माणशास्त्र पदविका अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था / नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास / प्रवेश क्षमता वाढ / घट / PIO व अभ्यासक्रम बंद करण्यास शासन मान्यता विचारात घेऊन सोबत जोडलेल्या परिशिष्ट- A व B मधील संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार पदविका अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था सुरु करण्यास शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील .
२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील .सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेश क्षमता वर नमुद केल्याप्रमाणे मर्यादित राहील.
३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक (तंत्रशिक्षण) यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.
४) सदर पदविका अभ्यासक्रमासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची संलग्नता घेणे आवश्यक आहे .

५) संबंधित संस्थेने संचालक (तंत्रशिक्षण) यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) सदर पदविका अभ्यासक्रमांचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार/पध्दतीनुसार करण्यात येतील.

७) संस्थने अभ्यासक्रम चालविण्यास पुर्ण वेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रीक कर्मचारी नेमावे व शासन नियमाप्रमाणे वेतन व भत्ते कर्मचाऱ्यांना देण्यात यावे .तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादी बाबत तसेच विद्यार्थ्यांकडुन शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, बांद्रा, मुंबई यांच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपुर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे .तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, क्लासरुम इ.) करणे आवश्यक आहे.

९) सदर संस्था संचालक, तंत्रशिक्षण यांच्या नियंत्रणाखाली राहिल व संबंधित अभ्यासक्रमांच्या परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे, मुंबई यांच्याकडून घेतल्या जातील.

१०) शिक्षण शुल्क समितीने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिटयूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी ) ॲक्ट, १९८७ नुसार कारवाई करण्यात येईल.

११) रॅगिंग संदर्भात मा .सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

१२) सदर पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

१३) याशिवाय संचालक (तंत्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई व संचालक, महाराष्ट्र राज्य, तंत्र शिक्षण मंडळ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४०७२३१६३७०८६२०८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijaykant Govind Chandekar

Digitally signed by Vijaykant Govind Chandekar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijaykant Govind Chandekar
Date: 2014.07.25 14:19:42 +05'30'

(विजय चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे (पू), मुंबई - ५१.

३. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय (सर्व), (संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
४. संबंधित संस्था (संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

प्रत माहितीसाठी:-

१. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली ११०००१.
२. सहाय्यक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डिंग, दुसरा मजला, चर्चगेट, मुंबई.

## Annexure-A
## List of New Diploma Institutes Establish for A.Y.2014-15
## (शासन निर्णय क्र. मान्यता-2014/प्र.क्र. 52/तांशि-5, दि. 23.7.2014)

| Sr. No. | Current Application Number | DISTRICT | INSTITUTE_NAME | ADDRESS | INSTITUTION_ TYPE | PROGRAMME | SHIFT | LEVEL OF COURSE | FULL TIME PART TIME | AFFILIATING BODY | NAME OF COURSE | APPROVED INTAKE 2013-14 | APPROVED INTAKE 2014-15 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 1-2064662531 | WARDHA | DR. BABASAHEB AMBEDKAR INSTITUTE OF D-PHARM, SEWAGRAM | ADARSH NAGAR SEWAGRAM ROAD WARDHA-442001 | Unaided - Private | PHARMACY | 1st Shift | DIPLOMA | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education | PHARMACY | 0 | 60 |
| 2 | 1-2047379791 | BHANDARA | WAINGANGA POLYTECHNIC | NAGZIRA ROAD, SAKOLI | Unaided - Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | 1st Shift | DIPLOMA | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | CIVIL ENGINEERING | 0 | 60 |
| | | | | | | | | | | | COMPUTER SCIENCE & ENGINEERING | 0 | 60 |
| 3 | 1-2065769851 | AHMADNAGAR | HON.SHRI BABANRAO PACHPUTE VICHARDHARA TRUST'S PARIKRAMA DIPLOMA IN PHARMACEUTICAL SCIENES | AP KASHTI , TAL SHRIGONAD, DIST AHMEDNAGAR, 414701 | UNAIDED PRIVATE | PHARMACY | 1st Shift | DIPLOMA | FULL TIME | Maharashtra State board of Technical Education | PHARMACY | 0 | 60 |

**Annexure-B**

**List of Diploma Institutes for Variation / Reduction / Closure/ PIO for A.Y.2014-15**

**(शासन निर्णय क्र. मान्यता-2014/प्र.क्र. 52/तांशि-5, दि. 23.7.2014)**

| Sr. No. | District Name | DTE Code | Current Application Number | Permanent Institute ID | INSTITUTE NAME | ADDRESS | INSTITUTION TYPE | PROGRAMME | SHIFT | LEVEL OF COURSE | NAME OF COURSE | FULL TIME PART TIME | AFFILIATING BODY | APPROVED INTAKE 2013-14 | APPROVED INTAKE 2014-15 | PIO |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Parbhani | 2197 | 1-2013991446 | 1-475419225 | APURVA POLYTECHNIC | GAT NO. 88/02, RAWALGAON ROAD, SELU-431503, DIST-PARBHANI, MAHARASHTRA | Unaided - Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | 1st Shift | DIPLOMA | MEDICAL ELECTRONICS | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | 60 | 0 | NA |
| 2 | Nagpur | 4187 | 1-2013627054 | 1-7662741 | DR. BABASAHEB AMBEDKAR COLLEGE OF ENGINEERING AND RESEARCH, | WANADONGRI, HINGNA ROAD, NAGPUR. | Unaided - Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | 2nd Shift | DIPLOMA | ELECTRONICS & COMMUNICATION ENGG | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | 60 | 0 | NA |
| 3 | Nagpur | 4187 | 1-2013627054 | 1-7662741 | DR. BABASAHEB AMBEDKAR COLLEGE OF ENGINEERING AND RESEARCH, | WANADONGRI, HINGNA ROAD, NAGPUR. | Unaided - Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | 2nd Shift | DIPLOMA | MECHANICAL ENGINEERING | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | 60 | 0 | NA |
| 4 | Solapur | 6444 | 1-2014099825 | 1-440681303 | SHRIRAM INSTITUTE OF ENGINEERING AND TECHNOLOGY(POLYTECHNIC), PANIV | AT/P - PANIV, TAL- MALSHIRAS, DIST - SOLAPUR | Unaided - Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | 1st Shift | DIPLOMA | ELECTRONICS AND TELECOMMUNICATIONS ENGINEERING | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education, Mumbai | 120 | 60 | NA |
| 5 | Pune | 6817 | 1-2013156125 | 1-812320421 | SUHAS INSTITUTE OF TECHNOLOGY | GAT NO. 254, JAVJIBUVACHIWADI, POST: KASURDI, TALUKA - DAUND, | Unaided - Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | 1st Shift | DIPLOMA | ELECTRICAL ENGINEERING | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education | 0 | 60 | NA |
| 6 | Nagpur | 4151 | 1-2014153486 | 1-4187806 | TULSIRAMJI GAIKWAD-PATIL COLLEGE OF ENGINEERING AND TECHNOLOGY | KHASARA NO. 8/1, P.S.K. 74, MOHGAON, WARDHA ROAD, NAGPUR | Unaided - Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | 2nd Shift | DIPLOMA | CIVIL ENGINEERING | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education | 60 | 60 | Yes |
| 7 | Nagpur | 4151 | 1-2014153486 | 1-4187806 | TULSIRAMJI GAIKWAD-PATIL COLLEGE OF ENGINEERING AND TECHNOLOGY | KHASARA NO. 8/1, P.S.K. 74, MOHGAON, WARDHA ROAD, NAGPUR | Unaided - Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | 2nd Shift | DIPLOMA | ELECTRICAL ENGINEERING | FULL TIME | Maharashtra State Board of Technical Education | 60 | 60 | Yes |